राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंर्तगत मंजूर प्रस्तावांना निधी मुक्त करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**

शासन निर्णय क्रमांकः रानकृ- २०१६/प्र.क्र.८८/भाग-२/तां.क.१
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ डिसेंबर, २०१६

वाचा -

१. केंद्रीय पर्यावरण, वने व वातावरण बदल मंत्रालयाचे पत्र क्रमांक जे-२७०१७/३/२०१२-एन.आर.सी.डी-II(व्होल-II) दि. १४ जानेवारी, २०१६.
२. केंद्रीय पर्यावरण, वने व वातावरण बदल मंत्रालयाचे पत्र क्रमांक जे-२७०१७/३/२०१२-एन.आर.सी.डी-II(व्होल-II)/१६९ दि. २९ फेब्रुवारी, २०१६.
३. केंद्रीय पर्यावरण, वने व वातावरण बदल मंत्रालयाचे पत्र क्रमांक जे-२७०१७/२/२०१६-एन.आर.सी.डी-II दि. २३ सप्टेंबर, २०१६.

प्रस्तावना-

केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र.१ व संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत पुणे शहरातील मुळा-मुठा नदी संवर्धन करण्याच्या प्रस्तावासाठी केंद्र शासनामार्फत एकूण निधी रू.९९०.२६कोटी (अक्षरी रु. नऊशे नव्वद कोटी) इतक्या रकमेच्या प्रस्तावास मंजुरी दिलेली आहे. एकूण मंजूर निधी (रू.९९०.२६ कोटी) पैकी केंद्र शासनाच्या ८५ टक्के (रू.८४१.७२ कोटी ) हिस्सा व पुणे महानगरपालिकेचा १५ टक्के हिस्सा (रु.१४८.५४ कोटी) समाविष्ट आहे. पुणे महानगरपालिकेस योजनेंतर्गत द्यावयाच्या निधीच्या अनुषंगाने केंद्र शासन हिश्श्यापैकी रू.४.९९ कोटी (अक्षरी रु. चार कोटी नव्याण्णव लक्ष) व रु. २१.०० कोटी (अक्षरी रु. एकवीस कोटी) निधी राज्य शासनास वितरीत करण्यात आलेला आहे. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या सूचनेनुसार मा.मंत्रीमंडळाची मान्यता घेण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार दिनांक २९/११/२०१६ रोजीच्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत सदर प्रस्तावास मान्यता मिळालेली आहे. सबब, सदर प्रस्तावास केंद्रशासनामार्फ़त वितरित करण्यात आलेला निधी राज्य शासनामार्फ़त वितरित करण्यासाठी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासननिर्णय :-

दि. २९/११/२०१६ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत राष्ट्रीय नदी कृती योजनेतंर्गत राबववयाच्या प्रस्तावांच्या अनुषंगाने खालील बाबींना मान्यता देण्यात आली-

१. राष्ट्रीय नदी कृती योजनेंतर्गत योजनेची मार्गदर्शक तत्वे व अटींनुसार राज्यातील मंजूर होणा-या प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. राष्ट्रीय नदी कृती योजनेंतर्गत केंद्र शासनाव्दारे वेळोवेळी वितरित करण्यात येणारा निधी राज्य शासनाने संबंधित अंमलबजावणी करणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थेस उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. योजनेंतर्गत मंजूर प्रस्तावांच्या अनुषंगाने स्थानिक स्वराज्य संस्थेच्या हिस्सापैकी काही भार वा प्रस्तावाच्या कोणत्याही परिस्थितीत वाढीव किंमतीचा भार राज्य शासनावर न टाकता स्थानिक स्वराज्य संस्थेने उचलणे यास मान्यता देण्यात येत आहे.

४. राष्ट्रीय नदी कृती योजनेंतर्गत पुणे शहरातील मुळा-मुठा नद्यांचे प्रदुषण निर्मुलन करण्यासाठी मंजूर रु.९९०.२६ कोटीचा प्रकल्प राबविण्यास मान्यता देणे व या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून वेळोवेळी राज्य शासनास उपलब्ध होणारा निधी पुणे महानगरपालिकेस वेळेवर वितरित करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. केंद्र शासनाच्या राष्ट्रीय नदी कृती योजनेंतर्गत, पुणे शहरातील मुळा-मुठा नदी संवर्धन करण्याबाबत केंद्र शासनामार्फत जायका संस्थेकडून आर्थिक मदत मिळण्यासाठी सादर करण्यात आलेल्या प्रकल्पास केंद्र शासनाने एकूण निधी रू.९९०.२६कोटी (अक्षरी रु. नऊशे नव्वद कोटी) इतक्या रकमेच्या प्रस्तावास मंजुरी दिलेली आहे. प्रस्तावांतर्गत केंद्र शासनामार्फत मंजूर करण्यात आलेल्या कामांचा तपशिल खालीलप्रमाणे-

| अ.क्र. | कामाचा तपशिल | मंजूर निधी (रु. कोटी) |
|---|---|---|
| १. | नदीत येणारे सांडपाणी अडविणे/ वळविणे प्रक्रिया संदर्भात कामे | १७९.८० |
| २. | सांडपाणी प्रक्रिया केंद्र (एसटीपी) बांधणे व त्यानुषंगिक कामे, मत्स्यबीज केंद्र उभारणी, बोटॅनिकल गार्डन | ६०८.१० |
| ३. | सुलभ शौचालये (२४), जनजागृती | २१.६० |
| ४. | जमिन अधिग्रहण, प्रकल्प सल्लागार व कर | ९१.५८ |
| ५. | सेन्टेज चार्जेस ८ टक्के | ६५.०० |
| ६. | वाढीव किंमत (price escalation) | २४.१८ |
| | **एकूण** | ९९०.२६ |

०३. या योजनेसाठी केंद्र शासन, जपान इंटरनॅशनल कॉपरेशन एजन्सी (जायका) व पुणे महानगरपालिका यांनी निधी दयावयाचा आहे. सदर प्रस्तावासाठी एकूण मंजूर निधी (रू.९९०.२६ कोटी) पैकी केंद्र शासनाच्या ८५ टक्के (रू.८४१.७२ कोटी ) हिस्सा व पुणे महानगरपालिकेचा १५ टक्के हिस्सा (रु.१४८.५४ कोटी) समाविष्ट आहे. पुणे महानगरपालिकेस योजनेंतर्गत द्यावयाच्या निधीच्या अनुषंगाने केंद्र शासन हिश्श्यापैकी रू.४.९९ कोटी दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ रोजीच्या

पत्रान्वये तसेच रु. २१.०० कोटी दि. २३ सप्टेंबर, २०१६ रोजीच्या पत्रान्वये राज्य शासनास वितरीत करण्यात आलेला आहे.

०४. सदर योजनेंतर्गत मंजूर प्रस्तावांचा निधी आकृतिबंध केंद्रशासन हिस्सा व प्रस्तावा संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा असा असेल. प्रकल्प पूर्ण करण्यास दिरंगाई झाल्यास केंद्र शासनाद्वारे वाढीव किंमत अनुज्ञेय नाही. अशा परिस्थितीत वाढीव किंमतीचा भार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने उचलावयाचा आहे.

०५. सदर प्रकल्पांतर्गत मंजूर कामे राबविण्यासाठी पुणे महानगरपालिकेस खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ. केंद्र शासनाच्या दिनांक १४.१.२०१६, दिनांक २४.२.२०१६ व दिनांक २३.९.२०१६ रोजीच्या पत्रात नमूद अटी व शर्तींचे पालन करण्याची जबाबदारी पुणे महानगरपालिकेची राहिल.

ब. सदर प्रस्तावांतर्गत मंजूर कामे ७२ महिन्यांच्या (६ वर्ष) कालावधीत म्हणजेच दि. ३१ जानेवारी, २०२२ पर्यंत पूर्ण करणे बंधनकारक आहे.

क. प्रकल्प पूर्ण करण्यास दिरंगाई झाल्यास केंद्र शासनाद्वारे वाढीव किंमत अनुज्ञेय नाही. अशा परिस्थितीत वाढीव किंमतीचा भार संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने उचलावयाचा आहे.

ड. आयुक्त, पुणे महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखाली "प्रकल्प अमलबजावणी कक्ष" (Project Implementation Unit) स्थापना करण्यात यावी.

ई. प्रकल्पांर्तगत राबविण्यात येणाऱ्या कामांचे वेळोवेळी त्रयस्थ संस्थेमार्फत परिक्षण(Third Party Inspection) करण्यात यावे.

ई. प्रकल्प व्यवस्थापक सल्लागार संस्था (Project Management Consultant) ची नेमणूक करण्यात यावी.

फ. प्रकल्पांर्तगत राबविण्यात आलेल्या कामांचा भौतिक व वित्तीय प्रगती अहवाल तसेच खर्चाचा तपशिल दर महिन्याला केंद्र शासनास राज्य शासनामार्फ़त पाठवावा.

ग. केंद्र शासन स्तरावर प्रकल्पाचे व्यवस्थापन व सनियंत्रण सल्लागार, राष्ट्रीय नदी संवर्धन संचालनालय यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीमार्फत करण्यात येणार असल्याने सदर बाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

०६. मुळा-मुठा नदी प्रदूषण कमी करण्याच्या योजनेसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक- यु-४, ३४३५, प्रधान लेखाशिर्ष - ३४३५ परिस्थितीकी व पर्यावरण, उपप्रधान लेखाशिर्ष - ०४ प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, गौण शिर्ष - १०३ वायु व जलप्रदूषण प्रतिबंध, गट शिर्ष - राष्ट्रीय नदी संवर्धन योजना, योजनेचे नाव - (०३) (०१) मुळा-मुठा नदी, पुणे प्रदूषण कमी करण्याचा प्रकल्प, केंद्र हिस्सा - ८५ %, (३४३५ १३६५) या लेखाशिर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०७. सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५६/२०१६/व्यय-१६ दि. २८ सप्टेंबर, २०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११३०१३१००६२३०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(डॉ.भ.ना.पाटील)
संचालक, पर्यावरण विभाग
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे.
५. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे.
६. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
११. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. प्रधानसचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१३. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१५. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.